# महाराष्ट्र शासन

क्रमांक - संकीर्ण-१११९/(१६३/१९)/तांशि-२
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०००३२,
दिनांक : २३ जानेवारी, २०२०

**विषय :** भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था, नागपुर या संस्थेस निधी वितरीत करणेबाबत.

वाचा - १. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. IIIT - २०१३/ (२३/१३)/तांशि-२, दिनांक २२.६.२०१५

२. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. धोरण-२०११/ (१५५/१४)/तांशि-२, दिनांक ०८.१२.२०१५

३. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. जमीन - २०१४/प्र.क्र.४५/ज-८, दिनांक २०.६.२०१५

४. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.जमीन - ३४१४/५८/प्र.क्र.१३१/ज-५, दिनांक २४.६.२०१५

५.शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९

६.संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक ९(२)/ नियोजन/ २०१९/२९, दिनांक २० जानेवारी, २०२० रोजीचे पत्र.

**शासन ज्ञापन**

भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेची Not for profit Public Partnership (N- PPP) या तत्त्वावर नागपूर व पुणे येथे स्थापना करण्यास दिनांक २०.५.२०१५ च्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार नागपूर व पुणे येथे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेची स्थापना करण्याबाबत या विभागाने अनुक्रमे दिनांक २२.६.२०१५ व दिनांक ८.१२.२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित केले आहेत. तसेच नागपूर येथे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेच्या स्थापनेकरीता महसूल व वन विभागाने सदर संस्थेस मौजे- वारंगा, ता. नागपूर (ग्रा.) जिल्हा नागपूर येथील ३९.९६ हेक्टर आर शासकीय जमीन नाममात्र भाड्याने देण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २०/०६/२०१५ रोजी निर्गमित केला आहे. तसेच पुणे येथे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था, पुणे या संस्थेच्या स्थापनेकरीता महसूल व वन विभागाने सदर संस्थेस मौ.नाणोली तर्फे चाकण, ता.मावळ, जिल्हा पुणे येथील ४०.०० हेक्टर आर शासकीय जमीन नाममात्र भाड्याने देण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २४.६.२०१५ रोजी निर्गमित केला आहे.

२. भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेची नागपूर व पुणे येथे स्थापना करण्याच्या अनुषंगाने केंद्रशासन, राज्य शासन व खाजगी उद्योजक यांमध्ये दिनांक १२.१२.२०१५ रोजी MoU व MoA स्वाक्षरीत करण्यात आलेला आहे. त्याचप्रमाणे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था नागपूर या संस्थेची नोंदणी करण्यात आलेली आहे. सदरहू संस्थेत शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून अभ्यासक्रम सुरु करण्यात आला आहे.

३. सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेकरिता "२२०३, तंत्रशिक्षण, -भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेची स्थापना करणे॰ (२२०३ २७३१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली रु.३५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला असून दिनांक ०८.०७.२०१९ रोजीच्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील मुद्दा क्रमांक ४ मध्ये नमूद केल्यानुसार ६०% म्हणजेच रु. २१००. ०० लक्ष इतका निधी बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेला आहे.

४. सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर व बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीपैकी अवितरीत असलेला रु. ३५०.०० लक्ष (रुपये तीनशे पन्नास लक्ष फक्त) इतका निधी भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था नागपूर, या संस्थेस इतका निधी कोषागारातून आहरित करण्यास या शासन ज्ञापनान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

५. सदरची रक्कम संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आहरित करावी. या प्रकरणी रक्कम आहरित करण्यास संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. या प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिच्छेद क्रमांक ७ मधील तरतुदींची संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून खातरजमा करण्यात आली आहे. सदरचे शासन ज्ञापन हे वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ च्या तरतुदींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००१२३११५०४०९२०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e985 9a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2020.01.23 11:53:23 +05'30'

**(प्रकाश भास्करराव आव्हाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर

३) संचालक, भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था, नागपूर.

४) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ , महाराष्ट्र, मुंबई

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर

७) प्रधान महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई

८) महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,

१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

११) कार्यासन अधिकारी- साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) निवड नस्ती-तांशि-२